**अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने दिलेल्या मान्यतेस अनुसरून शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून व्यावसायीक पदविका अभ्यासक्रमाची संस्था टप्प्याटप्प्याने बंद (Progressive Closure) करण्यास शासनाची मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. मान्यता-२०१८/(प्र.क्र.२११/१८)/तांशि-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० सप्टेंबर, २०१८.

**वाचा :-** १) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. F.No.westen/ १-३५०८४४२०३४/२०१८/ Progressive Closure, दि ३०/०४/१७.

२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.१०/एनजीपी/संस्था बंद/२०१८/१००१, दिनांक १८/०८/२०१८.

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी संदर्भ क्रमांक १ च्या पत्रान्वये व्यावसायीक पदविका अभ्यासक्रमाची संस्था टप्प्याटप्प्याने बंद (Progressive Closure) करण्यास मान्यता दिलेली आहे. सदर मान्यतेस अनुसरून संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांनी त्यांचे उपरोक्त दिनांक १८/०८/२०१८ चे पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी खालील नमुद व्यावसायीक पदविका अभ्यासक्रमाची संस्था शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून टप्प्याटप्प्याने बंद (Progressive Closure) करण्यास मान्यता दिलेली आहे.

| Sr. No. | DTE Code | Institute Name and Address | Course Name | Type of Courses | Intake |
|---|---|---|---|---|---|
| 1 | 2510 | Dr.D.Y.Patil Pratisthan's Padmashree Dr. D.Y.Patil Polytechnic, Sector 29, Nigdi Pradhikaran, Akurdi, Pune- 411044. | Diploma in Computer Engineering | First Shift | 60 |
| | | | Diploma in Electronics & Telecommunication Engineering | First Shift | 60 |
| | | | Diploma in Information Technology | First Shift | 60 |
| | | | Diploma in Mechanical Engineering | First Shift | 120 |

२. अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन उपरोक्त प्रपत्रामध्ये नमुद व्यावसायीक पदविका अभ्यासक्रमाची संस्था शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून टप्प्याटप्प्याने बंद (Progressive Closure) करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. या संस्थेतील बंद करावयाच्या अभ्यासक्रमांच्या संबंधित सर्व दस्तऐवज जसे की गुणपत्रिका, उत्तरपत्रिका,निकालपत्रे, विद्यार्थ्यांचे पत्ते,फीच्या पावत्या इत्यादी बाबी संस्थेने महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाकडे सूपूर्द करणे आवश्यक राहील.

२. संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त शिक्षक वर्ग/कर्मचारी यांच्या सेवाविषयक व इतर बाबतीत न्यायप्रविष्ठ असलेली सर्व प्रकरणांची जबाबदारी संस्था प्रमुखांची राहील. भविष्यकाळात कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यास सर्वस्वी संस्था जबाबदार राहील.

३. संस्थेकडून शासनाची वसुली अद्यापी थकबाकी असल्यास त्याचा भरणा करणे संस्था प्रमुखांवर बंधनकारक राहील.

४. संस्थेमध्ये सदर अभ्यासक्रम राबविण्यासाठी आवश्यक स्थावर जंगम मालमत्तेविषयी या संस्थेने शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतलेले असल्याचे यापुढे निदर्शनास आल्यास त्याची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील.

५. संस्थेतील संबंधित अभ्यासक्रम बंद केल्यानंतर त्या संस्थेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना व माजी विद्यार्थ्यांना परिक्षेस बसण्याची इच्छा असल्यास त्याची पर्यायी व्यवस्था करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

६. संबंधित अभ्यासक्रमांसाठी नियुक्त केलेल्या संस्थेतील शिक्षक व कर्मचारी यांना देय असलेले वेतन, वेतन भरपाई व अन्य आर्थिक प्रदानाचे भुगतान करणे संस्थेस बंधनकारक राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९१०१४५८५११२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2018.09.10 15:01:19 +05'30'

**( अ.र. काटकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, वांद्रे (पुर्व), मुंबई,
३. सहसंचालक विभागीय कार्यालय, पुणे,
४. संबंधित संस्था (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत),
५. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली ११०००१.,
६. विभागीय अधिकारी, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डिंग, दुसरा मजला, चर्चगेट, मुंबई,
७. निवड नस्ती / तांशि-५.